सन २०२०-२१ मधील अर्थसंकल्पीत
तरतूदीचे वितरण करणेबाबत.
राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंर्तगत (STCCS) प्राथमिक कृषि पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (२४२५२५१५)

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण ०६२०/ प्र.क्र.४४/१८-स
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक सीसीआर ०३१३/प्र.क्र.१४४/ २-स, दिनांक ०६/०९/२०१४ व दिनांक ०२/०८/२०१७
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६/०४/२०२०
४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं ०७१९/ प्र.क्र.८०/१८-स, दिनांक ३०/०७/२०१९
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.३-सआ/ १/भुविकास/Format A/२०२०, दिनांक १९/०६/२०२०

प्रस्तावना :-

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतकऱ्यांना पीककर्ज पुरवठा होण्यासाठी प्राथमिक कृषि पतपुरवठा संस्थांचे सक्षमीकरण करण्यासाठी शासनामार्फत पीक कर्ज पुरवठ्याच्या प्रमाणात अर्थसहाय्य करण्याचा निर्णय घेतलेला आहे. या संस्थांनी प्रत्येक आर्थिक वर्षात केलेल्या कर्ज वाटपाच्या प्रमाणात ०.५% ते १.५% अर्थसहाय्य देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. अर्थसहाय्य देण्यात येणाऱ्या प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांनी शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी/निकषांची पूर्तता करणे बंधनकारक आहे.

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी राज्यातील शेतकऱ्यांना पीक कर्ज पुरवठा होण्यासाठी प्राथमिक कृषी पतपुरवठा संस्थांचे सक्षमीकरण सहाय्य योजनेअंतर्गत निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) प्राथमिक कृषि पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (२४२५२५१५) - ३३ अर्थसहाय्य खाली रू.४०६६.०० लाख अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी १५ टक्के म्हणजेच रू. ६०९.९० लाख (रूपये सहाशे नऊ लाख नव्वद हजार फक्त) एवढ्या निधीचे वितरण करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६/०४/२०२० मधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. ३ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा-५, दि.१०/०५/२०१६ अन्वयेच्या परिशिष्ट “अ” नुसार या प्रकरणीची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

*(१)* **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६/०४/२०२० अन्वये उपरोक्त बाबीखालील १५ टक्के रक्कम नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने खर्च करण्यास मंजूरी देण्यात आली असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

*(२)* **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी रूपये ४०६६.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत झालेला आहे.

*(३)* **यास्तव** मागील ३ महिन्यापूर्वी निधी वाटप करण्यात आलेला नाही. यास्तव दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला नाही.

*(४)* ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.

*(५)* स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

*(६)* वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- या योजनेअंतर्गत वैयक्तिक लाभार्थी नाहीत. प्राथमिक कृषी पतपुरवठा संस्था ह्या लाभार्थी आहेत.

*(७)* बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

*(८)* खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

७. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V0004-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन) आयुक्त सहकार पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा उपनिबंधक कार्यालयातील सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी

आहरण करून हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

८. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१९५), सहकारी संस्थांना सहाय्य (०१) - सहकारी संस्थांना सहाय्य (०१) (०२) राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषि पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (२४२५२५१५) ३३ अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०२०-२१ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र.२०७/१४३१, दि.१३/०८/२०२० तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र.२४६/२०२०/व्यय-२, दि. २४/०८/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९२११७५९२४८४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.09.21 18:00:43 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

अवर सचिव तथा सहनिबंधक सहकारी संस्था

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
५. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक. लि. मुंबई.
७. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
८. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई.
१०. नियोजन विभाग (का.१४३१), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (कार्या १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कोषागार अधिकारी, पुणे.
१३. निवड नस्ती-१८-स.